केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण) योजनेंतर्गत अनुसूचित जाती घटकासाठी जागतिक बँक सहाय्यित कामगिरी आधारीत प्रोत्साहन अनुदानाकरिता सन २०१९-२० या आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी सन २०२०-२१ च्या अर्थसंकल्पीय निधीतून वितरीत करणेबाबत.
केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २२१५ए१३२)

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२३/प्र.क्र.६१/अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- ३१ मार्च, २०२४

**वाचा :-** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, व दि.४.३.२०२४
२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची नस्ती क्र.स्वभामि-२०२४/प्र.क्र.२९/पापु-१६
३) शासन ज्ञापन समक्रमांक दि. ३१.३.२०२४

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण) योजनेंतर्गत अनुसूचित जाती घटकासाठी जागतिक बँक सहाय्यित कामगिरी आधारीत प्रोत्साहन अनुदान या योजनेतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०२, कलप्रणाल व स्वच्छता, ७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०१) स्वच्छ भारत मिशन (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २२१५ए१३२, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) खाली रु.११८८.०० लाख, तर राज्य हिस्सा लेखाशिर्ष २२१५ए१४१ ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) खाली रु.७९२.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत आहे. तसेच संदर्भाधीन क्र.३१.३.२०२४ च्या ज्ञापनान्वये केंद्र हिश्यासाठी रु.६६५.०२ लाख व राज्यहिश्यासाठी रु.४३६.६८ लाख इतका निधी पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील दि.१२.४.२०२३ व दि.४.३.२०२४ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरणाबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. केंद्र शासनाकडून या योनजेसाठी निधी प्राप्त होणार असल्याने पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या संदर्भाधीन नस्तीवर वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण) योजनेंतर्गत अनुसूचित जाती घटकासाठी पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध निधीनुसार (०१) (०१) स्वच्छ भारत मिशन (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २२१५ए१३२, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षातून रु.६५५.०२ लाख, तसेच राज्य हिस्सा लेखाशिर्ष २२१५ए१४१, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) यामध्ये रु.४३६.६८ लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग), मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी

विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.४.२०२३ व दि.४.३.२०२४ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.४.२०२३ व दि.४.३.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४१८/व्यय-३, दि.३०.३.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०४०३१६४९५४९५२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2024.04.03 16:59:10 +05'30'

**( प्रशाान्त पुं.वाघ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (WSSO), बेलापूर, नवी मुंबई
४) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (पापु-१६), मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग